**मुंबई विद्यापीठातील उपकुलसचिव आणि सहायक कुलसचिव या पदांच्या भरती प्रक्रियेची चौकशी करण्यासाठी समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. : संकिर्ण -२०२१/प्र.क्र.१३४/विशि-१,**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक:-२८ ऑगस्ट, २०२३

प्रस्तावनाः-

मुंबई विद्यापीठाकडून सन २००९ ते सन २०१३ या कालावधीत उप कुलसचिव आणि सहायक कुलसचिव या पदांकरिता भरती प्रकिया राबविण्यात आली होती. सदर भरती प्रकियेसंदर्भात शासनास तक्रारी प्राप्त झाल्या होत्या. त्यासंदर्भातील माहिती आणि कागदपत्रे संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांच्या दिनांक २२ मे,२०२३ च्या पत्रान्वये प्राप्त झाली आहेत. सदर भरती प्रक्रियेची सखोल चौकशी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

मुंबई विद्यापीठाकडून सन २००९ ते सन २०१३ या कालावधीत उप कुलसचिव आणि सहायक कुलसचिव या पदांकरिता भरती प्रकिया राबविण्यात आली होती. सदर भरती प्रक्रियेची सखोल चौकशी करण्यासाठी खालीलप्रमाणे त्रीसदस्यीय चौकशी समिती गठित करण्यात येत आहे.

| क्र | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | प्रा.श्री.आर.एस.माळी, माजी कुलगुरू | अध्यक्ष |
| २ | प्रा.श्री.एन.एस.उमराणी, माजी प्र-कुलगुरु | सदस्य |
| ३ | डॉ.किरण बोंदर, सह संचालक, उच्च शिक्षण, पुणे विभाग. | सदस्य सचिव |

०२. समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-

१) मुंबई विद्यापीठाकडून २००९ ते २०१३ या कालावधीत उप कुलसचिव आणि सहायक कुलसचिव ह्या पदांकरिता राबविण्यात आलेल्या भरती प्रकियेची, व्यक्तीनिहाय सखोल चौकशी करावी.
२) भरतीकरिता विहित प्रकिया राबविण्यात आली होती काय, यासंदर्भातील व्यक्तीनिहाय स्वयंस्पष्ट अभिप्राय सादर करावे.

३) भरती प्रक्रियेमध्ये पात्र ठरलेले उमेदवार संबंधित पदाकरिता आवश्यक असलेली शैक्षणिक, अनुभव, वयोमर्यादा इत्यादी अर्हता नियुक्तीच्या वेळी धारण करीत होते काय, याबद्दल व्यक्तीनिहाय स्वयंस्पष्ट अभिप्राय सादर करावे.

४) भरती प्रक्रियेमध्ये पात्र ठरलेल्या उमेदवारांची नियुक्ती वैध आहे काय, याबद्दल व्यक्तीनिहाय स्वयंस्पष्ट अभिप्राय सादर करावे.

५) सदर भरती प्रक्रियेमध्ये अनियमितता झाली होती काय, यासंदर्भातील व्यक्तीनिहाय, स्वयंस्पष्ट अभिप्राय शासनास सादर करावे.

६) भरती प्रक्रियेमध्ये अनियमितता झाली असल्यास, सदर अनियमिततेस जबाबदार असलेले अधिकारी कर्मचारी यांची नावे आणि त्यांची भरती प्रक्रियेमधील भुमिका ह्यासंदर्भातील माहिती शासनास सादर करावी.

वरीलप्रमाणे सखोल अभ्यास करून समितीने आपला अहवाल शासनास एक महिन्याच्या आत सादर करावा.

०३. समितीच्या बैठकांचे आयोजन मुंबई विद्यापीठाने करावे. तसेच समितीमधील अशासकीय सदस्यांचे मानधन व प्रवासभत्ता मुंबई विद्यापीठाने अदा करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०८२९१४४७१९९७०८ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.08.29 14:49:25 +05'30'

**(अजित बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) प्रा.श्री.आर.एस.माळी, माजी कुलगुरू,मुंबई.
६) प्रा.श्री.एन.एस.उमराणी, माजी प्र-कुलगुरु, मुंबई.
७) डॉ.किरण बोंदर, सह संचालक, उच्च शिक्षण, पुणे विभाग, पुणे.
८) निवड नस्ती (ताशि-६), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.